# बोधसुधा.

---

## गुणांची आवड. ( साकया. )

ों चित्तीं हें । लोकां गुण रुचती[1] पाहें ॥ ध्रु० ॥

ासासह[2] जो शीतल[3] झुळझुळ वारा वाहे ।
ुनी त्या संतुष्टमनें[4] सज्जन डोलत राहे ॥ १ ॥ ठे० ॥

गायन कर्णी[5] पडतां पन्नग[6] वेडा होतो ।
नवल मग सुजन परिसुनी[7] तल्लीनत्वा घेतो[8]॥ ।२॥ठे०॥

ताच्या संगसुखानें[10] खल[11] मान्यत्वा[12] पावे ।
ाठीं काय बुधानें[13] दोर गळां बांधावे ॥ ३ ॥ ठे० ॥

असे जरि मोठें तरि तें टाकुन हस्तीं घेई ।
ाईचें सुमन सुखानें लघु जें सुगंध देई ॥ ४ ॥ ठे० ॥

युक्त असून हि इच्छी नर केतकीस ध्याया ।
न परि रेशमी वसन त्या आवडतें बहु ल्याया[15]॥५॥ठे०॥

बोलतो ह्मणुन शुकाची रुचते संगति त्याला ।
न गोजिरीं हरिणबालकें आवडती बघण्याला ॥ ६ ॥ठे०॥

नसे गुण ज्यामधि कोणा न रुचे संगति त्याची ।
नराहुन ह्मणती बरवी संगति नित्य पशूची ॥७॥ठे०॥

नरानें नित्य झटावें बरवे गुण मिळवाया ।
तें मौक्तिकास लागे छिद्र[16] गळां शोभाया ॥८॥ ठे०॥

---

आवडतात. २ फुलांच्या वासासह. ३ ार. ४ आनंदित ५ कानांत. ६ साप. ७ ऐकून. ८ लुब्ध होतो. ९ गुणी म- ्या. १० सहवासानें. ११ दुष्ट. १२ मोठेपणाला. १३ श- ां. १४ किड्यांपासून झालेलें. १५ नेसण्याला. १६ भोंक.

## जन्म व्यर्थ ! ( दिंड्या. )

नित्य सोशी अपमान जगामाजी
करायाला ही निंद्य कर्म राजी ।
उदरपूर्तीची मुख्य आस ज्याला
तरी प्राणी जन्मास वृथा आला ॥ १ ॥
नसे विद्या अल्पही प्राप्त केली
गुणां मिळवाया श्रांत तनु न झाली ।
अर्थसंचय सद्गुणें नसे केला
तरी प्राणी जन्मास वृथा आला ॥ २ ॥
जयापासुन मायेस सुख न जालें
जया बघतां जनकास रडूं आलें ।
बंधुवर्गही मुरडितो नाक ज्याला
तरी प्राणी जन्मास वृथा आला ॥ ३ ॥
आप्त ज्याला आपुला ह्मणविण्याला
लाजतानी तरि लाज नसे ज्याला ।
भेट होतां टाळिती बुध जयाला
तरी प्राणी जन्मास वृथा आला ॥ ४ ॥
[illegible]

# नाश.

## अंजनीगीत.

नाश कुणाचा अज्ञानानें ।
होय कुणाचा अल्प चुकीनें ।
कोणी बुडतो ज्ञानमदानें । ठेवा हें चित्तीं ॥ १ ॥

जाळ्यामध्यें खग सांपडती ।
* नलिकेवरती शुकें आडकती ।
मोठे हत्ती पंकीं रुतती । पडताती व्यसनीं ॥ २ ॥

मांसकणाला खावें ह्मणुनी ।
मत्स्य घेतसे गळीं टोंचुनी ।
पतंग दीपीं झेंप घालुनी । वेंची प्राणांला ॥ ३ ॥

कलुशालागीं मंत्री केलें ।
निजमंत्र्यांना अवमानीलें ।
स्वतांस म्लेच्छांच्या करिं दिधलें । संभाजीरायें॥४॥

सुमेरसिंगें वचनीं गुंतुनी ।
आनंदीची आज्ञा ह्मणुनी ।
नारायणरावाला वधुनी । पातक बहु केलें ॥ ५ ॥

---

१ शहाणपणाच्या गर्वानें. २ पक्षी ३ नळावर. ४ पोपट. ५ चिखलांत. ६ अडकतात. ७ संकटांत. ८ खर्चितो. ९ अपमान केला. १० हातांत. ११ दिलें. १२ मारून.

* दोन झाडांना किंवा खांबांना दोरी बांधतात. त्या दोरींत लहान लहान नळ्या अडकवतात. त्यांवर पोपट बसले ह्मणजे त्या नळ्या उलट्या होऊन डोलूं लागतात. पोपट मोकळे असतात. पण 'आपण पडूं' या भीतीनें ते नळ्या सोडीत नाहींत, यामुळें पारध्यांस सहज सांपडतात.

मी शहाणा हा गर्व धरूनी ।
*मपीर[1] नानाशीं[2] झगडूनी[3] ।
हातीं त्याच्या लागे कंदनीं[4] । सोसी अपमाना ॥६॥
अज्ञानाचा नाश करावा ।
अल्प[5] दोष कळतां निरसावा[6] ।
ज्ञानाचा मद[7] टाकुन द्यावा । ठेवा हें चित्तीं ॥७॥

**सुखाचें साधन. पद.** (झाली ज्याची उपवर.)

संतोषामृत[8] प्राशनें[9] करितां,
दुःख न होई तुमच्या चित्ता ॥ ध्रु० ॥
वनगज[10] होती तृप्त[11] तृणानें[12],
तुष्ट[13] मुनी फलकंद[14] भक्षितां ॥ १ ॥ सं० ॥
श्रीमंताला जें सुख न मिळे,
उपभोगी दारिद्य मिरवितां ॥ २ ॥ सं० ॥
लोभी इच्छी नित्य धन तया,
जाळी धनप्राप्तीची चिंता ॥ ३ ॥ सं० ॥
ज्यास मिळेना वसन धड कधीं,
होय तोष त्या भलतें मिळतां ॥ ४ ॥ सं० ॥

नेसे वर वसनाला त्यातें,
होय दुःख त्याहुन वर बघतां ॥ ९ ॥

**आशा. पद.** ( वारी संकट हरि दामाजी. )

आशा दे लघुतां नित्य नराला । मोठ्या असुखोला ॥ध्रु०॥
आशापाशामधिं जो नर गंवसे । अपमानें न रुसे ॥
हस्ता पसरायां भी न धरितसे । लज्जा त्यागितसे ॥
मिळतां धन मोठे कष्ट करितसे । मानाला न पुसे ॥
आशा वामनत्व दे विष्णूला । कां न मग नराला ॥ १ ॥ आ०
मिळतां वाढे ती फार सदाही । तीस न मिति पाहीं ॥
धांवा चित्ताच्या पुढती घेई । कुंठित न चि होई ॥
ऐशी होय अनावर मग ती ही । तांपें मना देई ॥
ठेवीं आधीं तूं परिमित तिजला । सौख्यद हें तुजला ॥ २ ॥ आ०
लोभें भृंग प्रथम त्या मोगरिला । आनंदें रमला ॥
आशा उडवी परि तेथुनि त्याला । ने मलयगिरीला ॥
सोडी त्या स्थाना बघुन जुईला । तेथें बहु रमला ॥
उडुनी तेथुनि ही कमलीं बसला । रात्रीं आडकला ॥ ३ ॥ आ०

**सज्जनांचा मार्ग धरावा. पद.** संतत यत्नावीण तुला
धरिं तूं सन्मार्गास मुला । होइल सुख तुजशीं ॥ ध्रु० ॥
वाटे जड जरि पहिल्यानें । परिणामावर मन देणें ॥
होइल सुलभ हि संवयीनें । तेंच रुचे चित्तामीं ॥ १ ॥ ध्रु० ॥

१ चांगलें. २ लहानपणा. ३ दुःखाला. ४ आशेच्या पाशांत. ५ सांपडतो. ६ अप्रतिष्ठा झाली तरी. ७ पसरण्याला. ८ भय. ९ लहानपणा. १० सीमा, हद्द. ११ बंद होत नाहीं. १२ न आवरणारी. १३ दुःख. १४ बेताची. १५ सुख देणारें. १६ भुंगा. १७ मलय पर्वतावर. १८ चांगल्या मार्गाला. १९ सोपें. २० आवडतें.

बेरवें कौंडळ वर दिसतें । अंतरिं फार कडू असतें ॥
दुर्वर्तनिं जरि मन रमतें । सौख्य न दे मनुजासीं ॥ २ ॥
इक्षु फोडितां रदनांतें । दुःख जरी बा बहु होतें ॥
गोडी सुखवी जिव्हेतें । सन्मार्गी गोडी तशी ॥ ३ ॥

**वारंवार पहा. पद.**—( संत दयाळ कसे. )

कार्य कसें करितों । पहावें त्यांत किती चुकतों ॥ ध्रु० ॥
निजधन लोभी अल्प न वेंची ॥
जाय मरूनी ठेवून तसेंची ॥ १ ॥ का० ॥
फलभारानें आम्र हि लवला ।
होय हीनफल देतां सकलां ॥ २ ॥ का० ॥
अज्ञानानें पशु हि न व्हावें ।
मध्यम स्थितिनें नित्य असावें ॥ ३ ॥ का० ॥

**आधीं जपावें. पद.**—( ऐकें मम वचना. )

बाळा जप आधीं जप आधीं । पावेल नाश सुबुद्धी ॥ध्रु०॥
बाळपणीं विद्येला । साधीं येई न पुढें तुजला ॥ १ ॥बा०
ज्ञानाविण चालेना । तें परि विद्येविण गंवसेना ॥२॥ बा०
जग केवळ पैशाचें । तोही ज्ञानावीण न सांचे ॥ ३॥ बा०
तरुणपणीं संसारीं । दक्ष राहुनी कार्यें सारीं ॥ ४ ॥ बा०
होउनियां जें जातें । करितां शोक न हातीं येतें॥५॥बा०
वृद्धपणीं बा तुजला । शक्ति न राही श्रम करण्याला॥६॥बा०

## सज्जन. साक्या.

सज्जन तो चित्तीं । जाणें ज्याची हे वृत्ती[१] ॥ ध्रु० ॥
गरीब अथवा श्रीमंतासीं जो समचित्तें[२] वागे ।
दोघांच्याही करां फुलांचा वास जसा सम[३] लागे ॥१॥ स०
लागेना ज्या दुर्गुण काधिंही संगति असुन खळाची[४] ।
चंदन विषयमयें[५] होय न देहीं वसति असून अहीची[६]॥२॥स०
वपु[७] ज्याचें आनंदें[८] अक्षय परकार्यांत[९] झिजावें ।
ताप[१०] हरायीं[११] सर्व जनांचा व्यंजनें[१२] जेविं फिरावें. ॥ ३॥ स०
मुद्रा[१३] दिसते क्रूर जयाची तरवारीची धारा ।
हृदयीं मधुर दयारस[१४] विलसे[१५] कीं द्राक्षारस[१६] दुसरा ॥४॥स०
देतां कोणीं दुःख जयानें द्यावें सौख्य तयाला ।
कुऱ्हाड तोडी चंदनतरुतें[१७] लागे वास मुखाला ॥ ५ ॥ स०
परनिंदा[१८] करण्याहुन वाटे गोड जयास नें[१९] वदणें ।
दृष्टि न ज्याची अन्यकलत्रीं[२०] न रुचे परधन हरणें[२१]॥६॥स०

**आयुष्य क्षणभंगुर. पद.** ( रतहरिपद कमल कंज. )

क्षणभंगुर[२२] आयु[२३] ह्मणून भुलूं नको मोहें ॥ ध्रु० ॥
सत्कार्यीं[२४] धरुन प्रीति गुतुनि त्यांत राहें ।
आनंदें वय जाउन कीर्ति मिळे पाहें ॥ १ ॥ क्षण० ॥

---

१ स्वभाव. २ सारख्या मनानें. ३ सारखा. ४ दुष्टाची. ५ विषासारखा. ६ सर्पाची. ७ शरीर. ८ नेहमीं. ९ दुसऱ्याच्या कामांत. १० दुःख. ११ नाहींसं करण्याला. १२ पंख्यानें. १३ चेहरा. १४ दया हाच रस. १५ शोभतो. १६ द्राक्षांचा रस. १७ चंदनाच्या झाडाला. १८ दुसऱ्याची निंदा. १९ न बोलणें. २० दुसऱ्याच्या स्त्रीवर. २१ घेणें. २२ क्षणांत नाश पावणारें. २३ आयुष्य. २४ चांगल्या कामांत.

काय होय माझ्यानें आणीं न मनीं हें ।
दगड होय देव जरी घाय[1] बहुत सोहे[2] ॥ २ ॥ क्षण० ॥
सुमनाचें[3] आयु किती ठाउक तुज आहे ।
वास सुटे सुजनांतें ध्याया करिं[4] बाहे[5] ॥ ३ ॥ क्षण० ॥
सुजन करीं तें शोभे कंठीं डुलताहे ।
युवतींच्या[6] शिरीं कुठें पाहें रमताहे ॥ ४ ॥ क्षण० ॥

**आपलें तें खरें! पद.** ( मधमाशीला गांधिल. )

उगवे चंद्र नभीं । कशास्तव सांगावें मजला ॥ ध्रु० ॥
बुलबुल बोले कीं मी गावें । चांदण्यामध्यें स्वेच्छ उडावें ॥
मंजुळ शब्दानें रमवावें । साऱ्या लोकांला ॥ १ ॥ कशा०
कमळ ह्मणे मी शीघ्र फुलावें। किरणांनीं मम रूप खुलावें[7]॥
किरणांला मी आश्रय व्हावें।द्यावें सुख विधुला[8]॥२॥कशा०
ह्मणे ससा दंव फार पडावें । प्रातःकाळीं सुखें उडावें ॥
मन माझें सुप्रसन्न व्हावें । यास्तव विधु आला ॥३॥कशा०
श्वानें[9] ह्मणे कीं चोर न यावे । येतां मजला सहज कळावें ॥
धन्यास जागृत[10] सहज करावें । लागुन भुंकाला ॥४॥कशा०
खोंकड बोले मार्ग दिसावा । कुक्कुट[11] मजला सहज मिळावा ॥
तदनुग्रह[12] मजवरिच असावा । वाटे चित्ताला ॥५॥ कशा०
सोनकिडा बोले रागानें । स्पर्धा मजसीं करी बळानें ॥
झांकी मजला निजतेजानें[14] । न बरें थोराला ॥६ ॥ कशा०
जो तो अपुलें खरें मानितो । अभिमानानें व्यर्थ नाडतो ॥
सारासारविचार[15] करी तो । नर मज वर गमला ॥७॥कशा०

---

१ घाव, टोले. २ सहन करतो. ३ फुलाचें. ४. हातांत. ५ हाक मारतें. ६ तरुण स्त्रियांच्या. ७ शोभावें. ८ चंद्राला. ९ कुत्रें. १० जागें. ११ कोंबडा. १२ त्याची कृपा. १३ भांडण. १४ आपल्या प्रकाशानें. १५ चांगल्या वाईटाचा विचार.

## चांगला मुलगा.

**पद.** ( समय बहु अवघड. )

बरा सुत[१] एक हि तो गमला[२] । शोभवी जो सुकुला ॥ध्रु०॥
एक्या विधुनें शोभा येते । अप्रतिमा[३] निशिला[४] ॥ १ ॥ब०॥
सिंह बलानें एक करींप्रती । जिंकितसे विपुला[५] ॥ २ ॥ब०॥
दीप[६] सुशोभित मंदिर[७] करितो । हरुनी तमा[८] सकला॥ ३ ॥ब०॥
सुकुसुम[९] एक हि वासित[१०] करितें । सर्व वनास मुला॥४॥ब०॥

**याञ्चा[११]. पद.** ( कृपाघना तुज कां नये. )

लज्जा वाटो वदन[१२] पसरितां ।
दीन होऊनी याञ्चा करितां ॥ ध्रु० ॥
अवयव असुनी सकल चांगले ।
निरामयपणा[१३] शरिरीं वसतां ॥ १ ॥ ल० ॥
उद्योगामधिं कधिं न रोंवुनी[१४] ।
नित्य बरोबर भीक मागतां ॥ २ ॥ ल० ॥
जगण्याहुन या मरणें बरवें ।
मन फिरवीं या कार्यीं वळतां ॥ ३ ॥ ल० ॥
आलस्याला[१५] सोडुन देईं ।
ईशे[१६] दे तुज सुकार्यीं रमतां ॥ ४ ॥ ल० ॥

**उपयोगानें किमत येते, पद.** (लोक मला काय मुला.)

उपयोगें वस्तु जगीं मोल[१७] पावती ॥ ध्रु० ॥

---

१ मुलगा. २ वाटला. ३ फार. ४ रात्रीला. ५ फार. ६ दिवा. ७ घर. ८ काळोखाला. ९ चांगलें फूल. १० सुवासानें. युक्त. ११ मागणें. १२ तोंड. १३ निरोगीपणा. १४ न गुंतून. १५ आळसाला. १६ ईश्वर. १७ किमत येते. थोरपणा मिळतो.

भूवरि[1] जरि पुष्प पडे । पादतळीं[2] ही चुरडे ।
युवतिकरीं[3] पडतां शिरीं शोभतें अती ॥ उ० ॥ १ ॥
पुसती जन न जडाला[4] । दगड धरेवर पडला ।
मूर्तिकार[5] दे तयास वंद्य[6] आकृती ॥ उ० ॥ २ ॥
मारी सोमल हि जनां । बनवुन परि रसायणा ।
वैद्य दे अनामयत्व[7] रोगियांप्रती[8] ॥ ३ ॥ उ० ॥
स्वेच्छेनें जो वागे । धरितां भरतो रागें ।
दळवी त्यापासुन[9] परि धान्य सत्कृती[10] ॥ ४ ॥ उ० ॥
आकाशीं मात्र जाय । जीस न कीं हातपाय ।
कौशल्यें[11] तीच* किती माल वाहती ॥ ५ ॥ उ० ॥
चमके जी वीज नभीं[12] । मन वरितें[13] पाहुन भी[14] ।
कर जोडुन तीच उभी वृत्त[15] सांगती ॥ ६ ॥ उ० ॥

## जीभ आटोप. साक्या.

असत्य[16] गोष्टी सांगुन कोणी मागे रुकार तुजसीं ।
भीड धरुन ही असत्य वदणें नावडतें देवासीं ॥ १ ॥
जिव्हा आटोपीं । तेव्हां हेच युक्ति सोपी ॥ ध्रु० ॥
मूढमती जन[17] करिती बडबड अर्थ असेना कांहीं ।
खरें बोलतां उमज न पडुनी ते रुसती लवलाही[18] ॥ २ ॥ जि०
परक्याची निंदा करण्याला सांगे तुजला कोणी ।
रागांत हि अपशब्द बोलणें पाप असूंदे ध्यानीं[19] ॥ ३ ॥ जि०

---

१ पृथ्वीवर. २ पायांच्या खालीं. ३ तरुण स्त्रीच्या हातांत. ४ हालत नाहीं, बोलत नाहीं, अशाला. ५ मूर्ति करणारा. ६ पूजा करण्यास योग्य. ७ निरोगीपणा. ८ रोग्यांला. ९ वाऱ्या-पासून. १० कुशल मनुष्य. ११ कुशलपणानें. १२ आकाशांत. १३ घेते. १४ भय. १५ वर्तमान. १६ खोट्या. १७ मूर्ख लोक. १८ लागलेंच. १९ लक्ष्यांत. * वाफ.

## **चांगलें काम कर. पद.** ( राधाधरमधुमिलिंद. )

आचर[1] प्रेमें भल्या[2] । सततं[3] तूं वर कार्याप्रति मुला ॥ ध्रु ॥
कार्य न करितां बरें । तयाचें फळ येई कटु[4] तुला ॥१॥आ०
रति[5] न अकार्यी[6] धरीं । धरुनियां नाश करिसि आपुला ॥२॥
परिणामीं[7] जो बरा । धरीं तो मार्ग नित्य चांगला ॥३॥आ०॥
होय दुःख पतकरीं । खऱ्याला ईश्वर दे मदतिला ॥४॥आ०॥

## **गुण घ्या. पद.** ( घनःश्याम सुंदरा. )

अवलोकुन[8] दुनियेंतिल वस्तू गुण निवडून घ्यावे ।
दोष मात्र सर्व ही त्यागुनी स्वमन तोषवावें ॥ ध्रु० ॥
सूप जसें धान्यास घेउनि टाकितसे कोंडा ॥
मूर्तिकार निवडून घेतसे योग्य असा धोंडा ॥
रत्नपारखी[9] निवडुन घेतो खरीं मात्र रत्नें ।
दोष टाकुनी सद्गुण[10] घ्यावे आपण ही यत्नें ॥
गुणदोषांचें मिश्रण जिकडे तिकडे आढळतें ॥
गुण निवडुन घेणें हें संततं सज्जनांस रुचतें । ॥चाल.॥
गुणसमूह[11] वस्त्राला—मान्यतेलागिं[12] चढवी[13] ।
शीतलत्व[14] गंगेला—शिवशिरीं[15] पहा वसवी ।
गुणसमूह[11] मनुजाला—कीर्तिला पात्र[16] करवी ।
कायेवांचुन[17] वांचुन[18] लोकीं अमर[19] गुणें व्हावें ॥ १ ॥ अ० ॥

---

१ कर. २ चांगल्या. ( मुला ). ३ नेहमीं. ४ कडू. ५ प्रेम. ६ वाईट कामावर. ७ शेवटीं. ८ पाहून. ९ रत्नांची परीक्षा करणारा. १० चांगले गुण ११ गुणांचा समुदाय, दोऱ्यांचा समुदाय. १२ मोठपणाला. १३ नेतो. १४ गारपणा. १५ शंकराच्या मस्तकावर. १६ योग्य. १७ शरीरावांचून. १८ जगून. १९ नेहमीं राहणारें.

आरंभुनि कार्यास तडीला[1] न्यावें धैर्यानें ।
मदोन्मत्त[2] हत्तीस धरावें जैसें सिंहानें ॥
गडबड टाकुन कार्य करावें गंभीरें[3] मनानें ।
ध्यान धरुनियां मत्स्यें[4] धरावे जैसे बगळ्यानें ॥
मिळतां खावें फार परंतु अल्प हि भक्ष्यानें ।
तुष्ट[5] असावें सावध तैसें जैसें श्वानानें ॥चाल.॥
सोसुनियां शीतोष्णां[6]–न थकावें कामानें ।
रासभाजवळुनी[7] हा–गुण घेई सन्मानें ।
केधवां[8] उठावें हें–चरणायुध[9] मनि जाणें ।
स्त्रीजनलज्जा[10] रक्षायाला तो कैसा धांवे ॥ २ ॥ अव० ॥

**वाईट. मुलगा. पद.** ( त्याचा संग नको. )

लावी डाग कुपुत्र[11] कुळाला ।
नित्य देतसे बहु असुखाला[12] ॥ ध्रु० ॥
जळता[13] पादप[14] अखिल[15] वनातें ।
जाळितसे हें विदित[16] जनांतें ॥ १ ॥ लावी० ॥
तक्र[17] नाशी सर्व पयातें[18] ।
कज्जल[19] श्यामल[20] करि सुकरांतें[21] ॥ २ ॥ लावी० ॥
शेळीचे स्तन भार गळ्याला ।
शोभा देती न पय तान्हुल्यांला[22] ॥ ३ ॥ लावी० ॥

---

१ शेवटाला. २ मदानें माजलेल्या. ३ खोल. ४ मासे. ५ सुखी. ६ थंडी व ऊन ७ गाढवाच्या जवळून. ८ केव्हां. ९ कोंबडा १० बायकांची अबरू. ११ वाईट मुलगा. १२ दुःखाला. १३ जळणारा. १४ वृक्ष-झाड. १५ सगळ्या. १६ टाऊक. १७ ताक. १८ दुधाला. १९ काजळ. २० काळे. २१ चांगल्या हाताला. २२ तिच्या लहान मुलांला.

**उत्साह. पद.** ( राधाधरमधुमिलिंद. )

उत्साहें श्रम करीं । शेवटीं फळ लाधे[1] तुज तरी ॥ ध्रु० ॥
अभ्यासीं गुंतुनी । परीक्षा यश देईना जरी ॥ १ ॥ उ०॥
उद्योगीं गुंतुनी । जरी ती लक्ष्मी ने[2] तुला वैरी ॥२॥उ०॥
मारुत[3] जरि भेडवी । तडीला नेतो नाविक[4] तरी[5] ॥३॥उ०॥

**जिव्हा. पद.** ( वैशाखमास वासंतिक. )

हे रसना[6] तुज परमेशें[7] देणगी दिली ।
उपयोगीं योग्य अशा लावितां भली ॥ ध्रु० ॥
ज्ञात्याच्या[8] वाढविते लौकिकाप्रती ।
इष्ट[9] कार्य सिद्ध करी हितें[10] वदून ती ॥
माधुर्यें[11] मोहितसे जनमना अती ।
ईशगुणीं[12] रमतां ते फार शोभली ॥ १ ॥ हे० ॥
मूर्खाला हीच परी त्रास दे सदा ।
अपशब्दां वदुन वरी थोर आपदा[13] ।
चुगलीच्या सख्यत्वें[14] होय दुःखदा ।
चुकतां पंथ[15] तीच जनीं उभविते कली[16] ॥ २ ॥ हे०॥

**स्थानमाहात्म्य[17] पद.** ( निजरूपीं जगदाकृति भासा. )

थोरत्वा[18] अथवा लघुतेला[19] ।
स्थान देतसे कधि वस्तूला ॥ ध्रु० ॥

---

१ मिळेल. २ मिळणार नाहीं. ३ वारा. ४ नावाडी ५ होडी. ६ जीभ. ७ ईश्वरानें. ८ शहाण्याच्या. ९ इच्छिलेलें. १० हितकारक गोष्टी. ११ गोडीनें. १२ ईश्वराच्या गुणांत. १३ दुःख. १४ सोबतीनें. १५ मार्ग. १६ भांडण. १७ ठिकाणाचें मोठेपण. १८ मोठेपणाला. १९ लहानपणाला.

काळें अंजन परि नयेनीं तें ।
पावतसे परमा शोभेला ॥ १ ॥ थो० ॥
अब्धिशुक्तिमधिं जलें पडतां तें ।
पावतसे मौक्तिकरूपाला ॥ २ ॥ थो० ॥
उदकीं नक्र गजेंद्रा ओढी ।
श्वान महिवरी भिववी त्याला ॥ ३ ॥ थो० ॥
स्वस्थानीं रवि[१२] कमलां सुख दे ।
तेथुन गळतां दे असुखाला ॥ ४ ॥ थो० ॥

**विनय[१३]. पद.**

विद्या दे जरि मानाला ।
विनय करी द्विगुणित तरि त्याला ॥ ध्रु० ॥
रत्न शोभतें निजतेजानें ।
कांचन तें ही निजवर्णानें ।
वलयीं शोभा दोघांला ॥ १ ॥ विनय० ॥
साखरेप्रती मुळची गोडी ।
पय करितें जिव्हेला वेडी ।
मिश्रण सुखवी लोकांला ॥ २ ॥ विनय० ॥
सुंदरता कुसुमांची नयनां ।
सुखवी परिमळ तैसा घ्राणां ।
संगम सुखवी चित्ताला ॥ ३ ॥ विनय० ॥

---

१ काजळ. २ डोळ्यांत. ३ फार. ४ समुद्रांतील शिंपल्यांत. ५ पाणी. ६ मोत्यांच्या रूपाला. ७ पाण्यांत. ८ सुसर. ९ मोठ्या हत्तीला. १० पृथ्वीवर. ११ आपल्या ठिकाणीं असल्यावर. १२ सूर्य. १३ नम्रता. १४ दुप्पट. १५ सोनें. १६ आपल्या रंगानें. १७ आंगटींत १८ सुरेखपण. १९ फुलाची २० सुख देते. २१ वास. २२ नाकाला. २३ मिलाफ.

पुष्पफळेंयुतं[1] वृक्ष विलसती[2] ।
पक्षी फिरतां उत्तम दिसती ॥
दोघांनीं श्री[3] बागेला ॥ ४ ॥ विनय० ॥

**दिवस आणि रात्र. दिंड्या.**

सूर्य आला उदयाद्रिवरी[4] पाहें ।
ऊठ लागें कामास सौख्य लोहें[5] ।
दिवस आलासे काम करायाला ।
रात्र येते विश्रांति[6] द्यावयाला ॥ १ ॥
कसे पक्षी रजनीस घरीं येती ।
पडुनि घरट्यांमधिं सुखें नीज घेती ।
दिवस येतां वर चरायास जाती ।
दिशा दाही भक्ष्यार्थ[7] हिंडताती ॥ २ ॥
पशू रानीं धांवती बघ सकाळीं ।
घरीं येती बुडतांच अंशुमाळी[8] ।
दिवस घालविती काम करुन सारा[9] ।
स्वस्थ रात्रीं घेतात गृहीं थारा[10] ॥ ३ ॥
पळ हि कामाविण घालवीं न वांयां[11] ।
हौस चित्तीं धर काम बहु कराया ।
काम करितां तुज लाभ होय मोटा ।
अन्न वस्त्राला नये कधीं तोटा ॥ ४ ॥
काम करवेना सर्वदा तुझ्यानें ।
करवतें तों तें करीं आदरानें[12] ।

---

१ फुलें व फळें यांणीं युक्त. २ शोभतात. ३ शोभा. ४ उदयाचळावर. सूर्य उगवतो त्या ठिकाणीं. ५ घे. ६ विसांवा. ७ खाणं मिळवण्याकरितां. ८ सूर्य. ९ सगळा. १० आश्रय. ११ व्यर्थ. १२ मनापासून.

रात्र येते विश्रांति द्यावयाला ।
म्हणुन सत्कार्यी[1] घालवीं दिसाला ॥ ५ ॥
इच्छिशी जें सत्कार्य करायाला ।
तरुण असतां तें जातसे तडीला[2] ।
तरुणपण हा जों दिवस उगवलासे ।
रत[3] कार्यी तों मनीं धरुन ऐसें ॥ ६ ॥
वृद्धपणें[4] रजनी[5] मजसि मुला वाटे ।
इंद्रियांची तेधवां[6] शक्ति आटे[7] ।
तर्यां विश्रांती भाग पडे घ्याया ।
म्हणुन तरुणत्वा वेंचुं[8] नको वांयां[9] ॥ ७ ॥
जसा रात्रीं अंधार पडतसे तो ।
तसा वृद्धत्वीं[10] भ्रम[11] हि ताप[12] देतो ।
स्पष्ट वस्तू कळती न लोचनांला[13] ।
चांचपडणें चालतां भाग त्याला ॥ ८ ॥
दिवस लोटी जो काम करुन पाहीं ।
स्वस्थ चित्तें रात्रीस झोंप घेई ।
दिनीं[14] दुसऱ्या तो कष्ट करायाला ।
होय ताजा मागुता[15] जाण बाळा ॥ ९ ॥
तरुणपण जो लोटील उद्यमांत[16] ।
वृद्ध होतां न पडेल अडचणींत ।
घालविल जो वार्धक्य उद्यमांत ।
रमा[17] मोदें[18] नांदेल[19] तद्गृहांत[20] ॥ १० ॥

---

१ चांगल्या कामांत. २ शेवटाला. ३ गुंतून रहा. ४ म्हातारपण. ५ रात्र. ६ तेव्हां. ७ नाहींशी होते. ८ खर्चू नको. ९ व्यर्थ. १० म्हातारपणांत. ११ विसर. १२ दुःख. १३ डोळ्यांला. १४ दिवशीं. १५ मागून, फिरून. १६ उद्योगांत. १७ लक्ष्मी. १८ आनंदानें. १९ राहील. २० त्याच्या घरांत.

## अवयव. पद. ( सुविहित जहालें. )

अवयव दिधले[1] बहुत बरे ।
थोर ईश्वरें तुज सुखकरसे[2] ॥ ध्रु० ॥
रसना[3] परिमित[4] गोड वदो हे ।
न वदो शब्दहि उरगगरलसे[5] ॥ १ ॥ अ० ॥
नयन बघोत हि सुखद सृष्टिला ।
दुष्ट पदार्थी न कधिं परितसे ॥ २ ॥ अ० ॥
श्रवण[6] सुखें परिसोत[7] सत्कथा[8] ।
निंदा शब्द हि त्यजुन[9] भलतसे[10] ॥ ३ ॥ अ० ॥
विविध[11] कलांत असोत कर[12] पटु[13] ।
अपकृति[14] इतरां[15] न करुन अरिसे[16] ॥ ४ ॥ अ० ॥
मन चंचल जणुं मत्त[17] गजापरि[18] ।
करीं अकार्यी[19] रति[20] धरि न असें ॥ ५ ॥ अ० ॥

## कुळाची शोभा चांगला मुलगा.

### अंजनीगीत.

उदक[21] शोभतें कमलपंक्तिनें[22] ।
रात्रि शोभते पूर्णशशीनें[23] ॥
शोभे सत्कुल[24] सत्पुत्रानें[25] । या लोकीं तसें ॥ १ ॥

---

१ दिले. २ सुख देणारे असे. ३ जीभ. ४ थोडें ५ सर्पाच्या विषासारखे. ६ कान. ७ ऐकोत. ८ साधूंच्या गोष्टी. ९ टाकून. १० वेडेवांकडे. ११ अनेक. १२ हात. १३ कुशल. १४ अपाय. १५ दुसऱ्यांना. १६ शत्रुप्रमाणें. १७ माजलेल्या. १८ हत्तीप्रमाणें. १९ वाईट कामांत. २० गोडी. २१ पाणी. २२ कमळांच्या ओळीनें. २३ पूर्ण चंद्रानें, पौर्णिमेच्या चंद्रानें. २४ चांगलें कुळ. २५ चांगल्या मुलानें.

शोभे दंती[1] दानेपंक्तिनें[2] ।
अश्व[3] शोभतो निजवेगानें[4] ।
शोभे सत्कुल सत्पुत्रानें । या लोकीं तैसें ॥ २ ॥
वाणी शोभे व्याकरणानें ।
कांता[5] शोभे पतिप्रेमानें ।
शोभे सत्कुल सत्पुत्रानें । या लोकीं तैसें ॥ ३ ॥
जलाशया[6] जल[7] शोभा देतें ।
वल्ली[8] कुसुमें[9] सुंदर दिसते ।
सत्कुल सत्पुत्रानें वरितें । अप्रतिमा[10] शोभा ॥ ४ ॥

## हितवादी[11] (पद.)

कथितात[12] मुला हें जाणते[13] ॥ ध्रु० ॥
मनाप्रमाणें बोल बोलती । हितवादी असती न ते ॥१॥क०॥
हितवाद्यांना मनासारखें । बोलायास न साधतें ॥ २ ॥ क०॥
मधुर[14] असून ही हितकर[15] औषध मिळणें दुर्लभ[16] वाटतें ॥३॥

## माझा जन्म. (पद.)

माझा जन्म न माझ्याच करितां ।
कर चित्तीं विचार हा पुरता ॥ ध्रु० ॥
बहु श्रमुनी तूं जोडिशी[17] पैसा ।
परकार्यीं न वेंचिशी[18] पै सों[19] ॥ १ ॥ मा० ॥

---

१ हत्ती. २ मदाच्या ओळीनें. ३ घोडा. ४ आपल्या चालण्याच्या वेगानें. ५ बायको. ६ पाण्याच्या ठिकाणाला विहिरी तळीं यांना. ७ पाणी ८ वेल. ९ फुलानें. १० फार. ११ हिताच्या गोष्टी सांगणारे. १२ सांगतात. १३ शहाणे. १४ गोड १५ हितकरणारें. १६ फार कठीण. १७ मिळवितोस. १८ खर्च करितोस. १९ सहा.

धनलोभें कठोर होसी कैसा ।
गरिबांस न ह्मणसी हि बैसा ! ॥ २ ॥ मा० ॥
तरु फलभारानें लवती ।
घ्या काढुन सकलां ह्मणती ॥ ३ ॥ मा० ॥
असतां तूं बालक सानें ।
कोण करवी तुज पयःपान ॥ ४ ॥ मा० ॥
कोण शिकवी तुजला ज्ञान ।
कोण खेळे तुजसह जाण ॥ ५ ॥ मा० ॥
तुज बहुजनसाह्य मिळालें ।
ह्मणवुन तुज गुरुपर्ण आलें ॥ ६ ॥ मा० ॥
तूंही सकळांस साह्य करावें ।
तेणें धन्य जगीं ह्मणवावें ॥ ७ ॥ मा० ॥

**काम कर. पद.** ( ऊठिं गोपालजी. )

स्वच्छ झाल्या दिशा, उदय पावे रवी ।
सृष्टिच्या वैभवा काय दावी ।
झोंप टाकीं मुला ऊठ बा लौकरी ।
उद्यमीं आपुलें चित्त लावीं ॥ १ ॥ मुला० ॥
ऊठ बा लौकरी ऊठ वेगें ।
वेळ जो गत न ये जाण मागें ॥ ध्रु० ॥ मुला० ॥
पळ न दवडीं वृथा, उद्यमा वांचुनी ।
वांचुनी आळशी व्यर्थ लोकीं ।
उद्यमें कीर्ति तुज, उद्यमें संपदा ।
लाभते मुक्तिही उद्यमें कीं ॥ २ ॥ मुला० ॥

---

१ द्रव्याच्या लोभानें. २ क्रूर. ३ लहान. ४ दूधपिणें. ५ पुष्कळ लोकांची मदत. ६ मोठेपण. ७ मोठेपणाला. ८ दाखवितो.

जन्म लाधे तुला, मानवाचा बरा ।
ज्ञानठेवा वरी प्राप्त झाला ।
आळसें दवडितां, वेळ सारा वृथा ।
शत्रु तूं आपुला मात्र बाळा ॥ ३ ॥ मुला० ॥
व्यर्थ गेली घडी, तास जाईल बा ।
पक्ष मासांप्रती लोटिशी तूं ।
काळ येईल बा, धाक घालावया ।
तुजविणें वर तरी जीवजंतु ॥ ४ ॥ मुला० ॥

## ईश्वरास आठवा.

### पद. ( देदे प्रभो वरप्रदान दे. )

गागा मुखीं ईश्वरास गा ।
भाव धरुन आठवितां पतितजनां होय जो सगा ॥ ध्रु० ॥
स्वेच्छेनें निर्मुनियां । सुख देई पाळुनियां ।
नाशितसे स्वयें फिरुन अखिल या जगा ॥ १ ॥ गा० ॥
सम खग मृग नर ज्याला । करुणासागर जाला ।
स्मरतां जो कोणाला । देईना दगा ॥ २ ॥ गा० ॥
मेघ करी वृष्टीला । रवि देई तेजाला ।
ज्याची हे कृपा त्यास । हृदयीं बाळगा ॥ ३ ॥ गा० ॥